**बंदरातील भरीव गाळ उपसणी (३०५१ ०७३२) या योजनेसाठी सन २०२२-२३ मध्ये अर्थसंकल्पीत निधीपैकी रु.४.९९ कोटी इतका निधी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास खर्च करण्यात मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीजीटी १०२२/प्र.क्र.८८/बंदरे-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १७ मार्च, २०२३

**संदर्भ** :-१. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे पत्र क्र. ममेबो/मुकाअ/साचिअस /यां.आ/४५४७, दिनांक १९.१०.२०२२

२. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०८.०२.२०२३

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून राबविण्यात येणाऱ्या “बंदरातील भरीव गाळ उपसणी” या योजनेकरीता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रु.२१.०० कोटी इतक्या रकमेपैकी रु.४,९९,३०,०००/-(अक्षरी चार कोटी नव्याण्णव लक्ष तीस हजार) इतका निधी खालील कामांसाठी खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजपत्रकीय किंमत | प्रशासकीय मान्यतेचा आदेश क्रमांक व दिनांक | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| १. | मांडवा बंदर येथे नौकानयन मार्गातील गाळ उपसणी करणे | रु.**४,९९,३०,०००/** | क्र.ममेबो/मुकाअ/साअचिस/गाळ उपसणी/२०२२-२३/६१४, दि.२०.०९.२०२२ | रु.**४,९९,३०,०००/** |

२. सदर निधी ज्या कामांकरीता वितरीत करण्यात येत आहे, त्याच कामांवर व विहित कालावधीत खर्ची पडेल, याबाबत आवश्यक ती दक्षता घेण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांची राहील.

३. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०४.०४.२०२२ व दि. ०८.०२.२०२३ च्या परिपत्रकातील सूचनांचे व तरतुदींचे पालन करण्यात यावे. तसेच, सदरचा निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकिय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

४. सदरचा निधी खर्च झाल्यानंतर खर्चाची उपयोगीता प्रमाणपत्रे शासनास सादर करण्यात यावीत.

५. या वितरीत करावयाच्या तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे राहतील.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८३/का-१४६१ , दि.०२.११.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३९६/व्यय-८, दि.०९.११.२०२२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. बी-७, ३०५१-बंदरे व दिपगृहे, ०० ०२ लहान बंदरे, (८०) सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (०१) मेरीटाईम बोर्डास सहायक अनुदान, (०१)(०५) बंदरात मोठया प्रमाणात गाळ उपसणी (राज्य) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (३०५६ ०७३२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३१७१३२८२४६३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILIMA MAHADEV KAMBLE

Digitally signed by NILIMA MAHADEV KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=0a1748b905e770db90369b30966380ad4482c802aeb9a208c0273473e9c24d7e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B635A0BA362D807D0A2AD2942C69531FAFE53ABFCAC9AB809231BD295B40EBE2, cn=NILIMA MAHADEV KAMBLE
Date: 2023.03.17 13:33:13 +05'30'

**(निलीमा कांबळे)**

**कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
२) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
३) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
४) प्रधान सचिव(बंदरे), गृह विभाग.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग.
९) निवडनस्ती(बंदरे-२).